**भूमि अभिलेख विभागासाठी ई.टी.एस. मशीन खरेदी करीता अनुदान मंजूर करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग**
**शासन आदेश क्रमांक : राभूअ -२०१६/ प्र.क्र. ५४/ ल-१**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा चौक
मंत्रालय,मुंबई ४०० ०३२
तारीख : ३० मार्च २०१७

वाचा - १) शासन निर्णय महसूल व वन विभाग क्र. राभूअ-२०१४/ प्र.क्र. २४३/ल-१, दि. २५.११.२०१४

२) जमाबंदी आयुक्त आणि संचालक, भूमि अभिलेख (म.राज्य), पुणे यांचे पत्र क्र.लेखा-३/ अनु. मागणी/ ईटीएस मशीन खरेदी/२०१६/५४९, दिनांक ३.१०.२०१६.

३) शासन परिपत्रक, वित्त विभाग क्र. संकीर्ण-२०१७/प्र.क्र. ७/कोषा-प्र. ५, दि. १७.०१.२०१७

४) शासन परिपत्रक वित्त विभाग क्र. अर्थसं-२०१७/प्र.क्र.८९/अर्थ-३, दि. ८.०२.२०१७

**आदेश**

जमीन मोजणी आधुनिक पध्दतीने, अचूक व जलद गतीने करणे साठी इलेक्ट्रॉनिक टोटल स्टेशन (ई.टी.एस.) हे अत्यंत महत्वाचे आधुनिक साधन असल्याने संदर्भाधीन क्रमांक १ येथील शासन निर्णयान्वये भूमि अभिलेख विभागासाठी १६९२ ई.टी.एस. मशिन्स खरेदी करण्यास व त्यासाठी येणा-या रु. ७६,१४,००,०००/- इतक्या खर्चास, निधी उपलब्धतेच्या अधीन राहून प्रशासकीय मान्यता देण्यात आली आहे. त्या अनुषंगाने रु. ७,७३,२०,०००/-(रुपये सात कोटी त्र्याहत्तर लाख वीस हजार फक्त) इतका निधी वितरीत करण्यास व संदर्भाधीन क्रमांक ३ येथील परिपत्रकातील अट शिथिल करुन ई.टी.एस. मशिन्स खरेदी करण्यास शासन याद्वारे मान्यता देत आहे. सदर निधीतून इलेक्ट्रॉनिक टोटल स्टेशन (ई.टी.एस.) खरेदी शासनाने विहीत केलेल्या खरेदीच्या कार्यपध्दतीनुसार व संदर्भाधीन क्रमांक ४ येथील परिपत्रकातील अटींच्या अधीन राहून करण्यात यावी.

२. या प्रयोजनासाठी जमाबंदी आयुक्त आणि संचालक भूमि अभिलेख, महाराष्ट्र राज्य पुणे यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून प्राधिकृत करण्यात येत आहे.

३. यासाठी होणारा खर्च "मागणी क्रमांक सी १, २०२९ जमीन महसूल १०३ भूमि अभिलेख (०२) (०१) संचालक भूमि अभिलेख (२०२९०४२२) (योजनेतर)" या लेखाशीर्षाखाली सन २०१६-२०१७ या वित्तीय वर्षात मंजूर तरतुदीमधून भागविण्यात यावा.

४. हा शासन निर्णय वित्त विभागाने त्यांच्या अनौपचारिक संदर्भ क्र. २०१७/५३, कोषा-५, दि. १४/०३/२०१७ अन्वये दिलेल्या सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०३३०२०३५२२५५१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्याआदेशानुसार व नावाने.

Santosh Haridasrao Bhogle

Digitally signed by Santosh Haridasrao Bhogle
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Revenue And Forest Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=cfe36679ae12922422bc5e7f7d277841f1fe67725f465c272fd6727259260b3d, cn=Santosh Haridasrao Bhogle
Date: 2017.03.30 20:37:35 +05'30'

**(डॉ. संतोष भोगले)**
**उप सचिव,**
**महसूल व वन विभाग**

**प्रति,,**

१. मा. राज्यपाल यांचे सचिव, राजभवन, मुंबई
२. मा. मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई
३. मा. मंत्री (महसूल) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
४. मा. राज्यमंत्री (महसूल) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
५. मा. मुख्य सचिव यांचे सह सचिव, मंत्रालय, मुंबई
६. मा. प्रधान सचिव (महसूल), महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई
७. मा. प्रधान सचिव (माहिती तंत्रज्ञान), माहिती तंत्रज्ञान विभाग, मंत्रालय, मुंबई
८. सर्व विभागीय आयुक्त
९. जमाबंदी आयुक्त आणि संचालक, भूमि अभिलेख (महाराष्ट्र राज्य), पुणे
१०.सर्व जिल्हाधिकारी
११.कोषागार अधिकारी, पुणे
१२.महालेखापाल (लेखा परीक्षा), महाराष्ट्र १ व २, मुंबई/नागपूर
१३.महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र १ व २, मुंबई/नागपूर
१४.वित्त विभाग,कार्यासन क्र. व्यय १०/अर्थसंकल्प-६/कोषा प्रशा-५, मंत्रालय, मुंबई
१५.निवड नस्ती ल-१